इमारतींच्या स्थापत्य कामाच्या निविदांमध्ये विद्युतीकरणाच्या कामाचा अंतर्भाव करून एकत्रित निविदा काढणे बाबत सुधारीत सूचना

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक :-एसयुटी ०५/१३/प्र.क्र.११८/इमा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५/१२/२०१९

वाचा :- १. शा.नि.क्र.सीएटी १०९७ / ६९३/ इमा - २ दि.२७.०१.२००४
२. शासन परिपत्रक क्र. सीएटी ०३ / ११ / प्र.क्र.१०९ / इमा-२ दि. २४.०३.२०११
३. रिट पिटीशन क्र. ३१९६ / २०१३ बाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ यांचा दि.१०.०४.२०१४ चा आदेश
४. रिट पिटीशन क्र.१४७०/२०१९ बाबत मा.उच्च न्यायलय, मुंबई यांचा दि. ०५.०९.२०१९ चा आदेश
५. सार्वजनिक बांधकाम विभागाचे पत्र क्र.संकीर्ण ८ /१३/ प्र.क्र.१९३/ इमा-२ दि.२१.०५.२०१४

**प्रस्तावना :-**

दि.२७.०१.२००४ च्या शासन निर्णयान्वये शासकीय इमारतींच्या रु.१ कोटी व त्यापेक्षा अधिक किंमतीच्या बांधकामाच्या स्थापत्य व विद्युत कामाच्या एकत्रित निविदा काढण्यास मंजूरी देण्यात आली होती. या शासन निर्णया विरोधात औरंगाबाद इलेक्ट्रिकल कॉन्ट्रॅक्टर्स असोसिएशन व इतर यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई अंतर्गत औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र. ३१९६/ २०१३ दाखल केली होती. सदर रिट याचिकेच्या दि.१०.०४.२०१४ रोजीच्या निकालान्वये दि.२७.०१.२००४ चा शासन निर्णय रद्द ठरविण्यात आला होता. तद्नंतर स्थापत्य व विद्युत कामांच्या एकत्रित निविदा प्रक्रियेस स्थगिती देण्यात आली व त्याप्रमाणे स्थापत्य व विद्युत कामांकरीता स्वतंत्र निविदा मागविण्यात येत आहेत.

२. इलेक्ट्रिकल कॉन्ट्रॅक्टर्स असोसिएशन ऑफ महाराष्ट्र विरुद्ध सिडको यांच्या रिट याचिका क्र.१४७०/२०१९ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई अंतर्गत औरंगाबाद खंडपीठ यांनी रिट याचिका क्र. ३१९६/ २०१३ मध्ये दि.१०.०४.२०१४ रोजी दिलेल्या निकालाचा पुनर्विचार करण्यात आला. त्यानंतर मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी औरंगाबाद खंडपीठाने दिलेला निर्णय खारीज केला असून सार्वजनिक बांधकाम विभागाचा दि.२७.०१.२००४ रोजीचा शासन निर्णय तसेच उपरोक्त दि.२४.०३.२०११ चे शासन परिपत्रक योग्य असल्याचा निर्णय दिला आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे या संदर्भातील यापूर्वीचे सर्व शासन निर्णय अधिक्रमित करून खालीलप्रमाणे सुधारीत सूचना देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

१. शासकीय इमारतींच्या कामांच्या रु.३ लक्ष व त्यापेक्षा अधिक किंमतीच्या बांधकामांच्या स्थापत्य व विद्युत कामांकरीता यापुढे एकत्रित निविदा मागविण्यात याव्यात.

**२. एकत्रित निविदेसाठी खालील कार्यपद्धतीचा अवलंब करावा :-**

२.१ कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (स्थापत्य) यांनी रु.३ लक्ष वरील इमारतींच्या नवीन बांधकाम व दुरुस्ती स्वरुपाच्या कामांच्या एकत्रित निविदा मागवाव्यात.

२.२ स्थापत्य व विद्युत कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकास संबंधित विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांनी त्यांच्याशी संबंधित भागास सर्वसाधारणपणे एकाच वेळी तांत्रिक मंजूरी द्यावी.

२.३ प्रारुप निविदा तयार करून त्यास मान्यता देत असताना स्थापत्य व विद्युत विषयक बाबींसाठी त्या त्या विभागाच्या सक्षम अधिकाऱ्याने त्यांच्याशी संबंधित भागास, परिशिष्ट -ब॰ मधील विनिर्देश, अटी व शर्ती इत्यादीस वेगवेगळी मंजूरी द्यावी. सामान्यत: या प्रक्रियेस १५ दिवसांपेक्षा जास्त विलंब झाल्यास संबंधीत स्थापत्य अभियंत्यांनी विद्युत बाबींचे परिमाण व निविदेतील अन्य समान स्वरूपाच्या कामांच्या मूळ मंजूर प्रारूप निविदेतून घेऊन निविदा प्रपत्रास कार्यकारी अभियंता / अधीक्षक अभियंता / मुख्य अभियंता स्तरावर मान्यता द्यावी अन्यथा विद्युत सल्लागार नेमून तांत्रिक अंदाजपत्रक व प्रारूप निविदा प्राप्त करून घ्यावे.

२.४ एकत्रित प्रारुप निविदेत स्थापत्य व विद्युत कामांसाठी वेगवेगळे परिशिष्ट -ब॰ मध्ये अनुक्रमे भाग-१ व भाग-२ ठेवावेत.

२.५ शासन निर्णय दि. १६ ऑगस्ट, २०१७ मधील तरतूदीनुसार रू. १.५० कोटी पेक्षा जास्त किंमतीच्या कामांकरीता अनोंदणीकृत कंत्राटदारांना अनुज्ञेय करण्यात आले असून एकत्रितपणे स्थापत्य व विद्युत कामांच्या कार्यान्वयनाकरीता अनोदणीकृत कंत्राटदार पात्र राहतील. नोंदणी आवश्यक नसली तरी विद्युत कामांबाबत अनुज्ञप्ती / परवाना (लायसन्स) अनिवार्य राहील. रु. १.५० कोटी पेक्षा कमी किंमतीच्या कामासाठी स्थापत्य नोंदणी अनिवार्य असली तरी विद्युत विभागाकडे नोंदणी अनिवार्य असणार नाही मात्र संबंधीत विद्युत पोट कंत्राटदाराकडे विद्युत कामाचा अनुज्ञप्ती परवाना असणे अनिवार्य राहील.

२.६ निविदा प्रक्रियेत नोंदणीकृत कंत्राटदार भाग घेत असल्यास व स्थापत्य कंत्राटदाराकडे विद्युत काम करण्याचा अनुज्ञप्ती परवाना नसेल तर अशा प्रकरणी, स्थापत्य कंत्राटदारास योग्य त्या वर्गातील विद्युत कंत्राटदारांसोबत Joint venture करता येऊ शकेल किंवा विद्युत कामाचा भाग अनुज्ञप्ती परवाना असलेल्या विद्युत कंत्राटदाराकडून पोटकराराने करता येऊ शकेल. निविदा भरतांना स्थापत्य कंत्राटदारांना ५०० रूपयाच्या स्टँप पेपरवर विद्युत कंत्राटदाराशी केलेला करारनामा जोडणे बंधनकारक राहील. मात्र स्थापत्य व विद्युत कामांसाठी निविदा तरतूदीसंदर्भात संपूर्ण जबाबदारी संयुक्तरित्या मुख्य स्थापत्य कंत्राटदाराची राहील.

२.७ विद्युत विषयक बाबी उदा. विद्युतीकरण, उद्वाहने, ट्रान्स्फॉर्मर, मीटर्स बसविणे, विद्युत पुरवठा मिळविणे व अनुषंगिक कामे तसेच संबंधित विद्युत प्राधिकरण व महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत यांच्या सक्षम अधिकाऱ्यांशी समन्वय साधून सर्व विद्युत विषयक बाबींसाठी परवानगी/ना-हरकत प्रमाणपत्र इत्यादी प्राप्त करण्याची जबाबदारी मुख्य स्थापत्य कंत्राटदाराची असेल.

२.८ विद्युत विषयक कामांवर पर्यवेक्षण व देखरेख सध्याच्या प्रचलित पद्धतीप्रमाणेच संबंधित विद्युत विभागाचे अधिकारी करतील. विद्युत विभागाचे अधिकारी उपलब्ध नसल्यास अश्या अपरिहार्य परिस्थितीत विद्युत अभियंता सल्लागाराची कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करून मुख्य अभियंता (स्थापत्य) यांनी काम पूर्ण करून घ्यावे.

२.९ विद्युत विषयक कामाची मोजमापे विद्युत विभागाने घेऊन त्यानुसार तयार करण्यात आलेली देयके, विद्युत विभागाचे सक्षम अधिकारी / परिच्छेद २.८ मध्ये नियुक्त केलेले विद्युत सल्लागार यांनी सध्याच्या प्रचलित पद्धतीप्रमाणे पारीत करून स्थापत्य विभागाकडे अदा करण्यासाठी पाठवावीत. स्थापत्य विभागाने देयके पारीत करून स्थापत्य कामांबरोबरच विद्युत कामांच्या खर्चाचा लेखा एकत्रितपणे ठेवावा, तसेच कामावरील खर्चाची माहीती सादर करतांना एकत्रीतपणे शासन / मुख्य अभियंता यांना सादर करावी.

२.१० कामासाठीची सुरक्षा ठेव रक्कमेच्या १०% इतकी रक्कम परत करण्यापूर्वी विद्युत विभागा कडून अथवा नियुक्त विद्युत सल्लागाराकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करून घेणे बंधनकारक राहील.

३. सदर आदेश यापुढे प्रसिद्ध करावयाच्या निविदांसाठी लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या चा संकेताक २०१९१२०५१६१६०८३५१८ असा आहे. हे शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sachin Manikrao Chivate

Digitally signed by Sachin Manikrao Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, serialNumber=40ae84322c80d3e4ea1b574eb3782ed6cb133b938933bdf197ed5a1551d8622a, cn=Sachin Manikrao Chivate
Date: 2019.12.05 16:20:04 +05'30'

**( सचिन चिवटे )**
**अवर सचिव (इमारती)**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव/मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव
२. मा.मंत्री (सा.बां) यांचे खाजगी सचिव
३. अ.मु.स (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अ.मु.स (सा.बां)/सचिव (रस्ते)/सचिव (बांधकामे), सा.बां.विभाग, मंत्रालय
५. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई /निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९. सर्व मुख्य अभियंते, सा.बां.प्रा.विभाग व (विद्युत) विभाग
१०.सर्व अधीक्षक अभियंते, सा.बां.मंडळ व (विद्युत) मंडळ
११.सर्व अधिकारी व कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय
१२.निवडनस्ती (इमारती-२ कार्यासन)